उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/संस्थेमधील प्राचार्य/ संचालक या पदाच्या सन २०१५ मधील बदल्यांबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बदली-२०१५ (२३२/१५)/मशि-१**
मंत्रालय विस्तार, मादाम कामा मार्ग
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : २२/०७/२०१५.

# आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्य पार पडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(५) मध्ये विहीत केलेली तरतूदीस अनुसरुन उच्च शिक्षण संचालनालयाच्या अधिपत्याखालील शासकीय महाविद्यालये/संस्थांमधील प्राचार्य/संचालक या संवर्गातील खालील प्राचार्य/संचालक यांनी बदलीबाबत केलेली विनंती व त्यांची विनंती विचारात घेताना बदल्यांच्या अधिनियमातील कलम ३(१) मध्ये विहित केलेल्या कालावधीपेक्षा जास्त कालावधी झालेल्या प्राचार्य/संचालक यांच्या खालील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे परिणामस्वरूपत: (Resultant) बदल्या करण्यात येत आहेत.

| अ. क्र. | प्राचार्य/संचालकांची नावे | सध्या कार्यरत असलेले महाविद्यालये/संस्था | बदलीचे ठिकाण | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | डॉ.श्रीमती हेमलता वानखेडे, संचालक, | भा.प्रशासकीय सेवापुर्व प्रशिक्षण केंद्र, औरंगाबाद | शासकीय विज्ञान संस्था, औरंगाबाद | डॉ. देशपांडे यांच्याकडील कार्यभार समाप्त करून (विनंती बदली) |
| २ | डॉ. आर.बी. मानेकर, प्राचार्य | शासकीय अध्यापक महाविद्यालय, बुलढाणा | प्राचार्य, शा. अध्या. महा., अकोला | श्रीमती रोडगे यांच्या बदलीने रिक्त पदावर (प्रशासकीय कारणास्तव) |
| ३ | डॉ. श्रीमती सुनंदा रोडगे, प्राचार्य | प्राचार्य, शा. अध्यापक महाविद्यालय, अकोला | शासकीय अध्यापक महा., नांदेड | डॉ. धूत यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी (विनंती बदली) |
| ४ | डॉ. उर्मिला धूत | शासकीय अध्यापक महाविद्यालय, नांदेड | शास. अध्यापक महा., मुंबई | सुहासकुमार पाटील यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी (प्रशासकीय कारणास्तव) |
| ५ | डॉ. श्री. सुहासकुमार पाटील, प्राचार्य | शासकीय अध्यापक महाविद्यालय, मुंबई | प्राचार्य, शासकीय अध्या. महा,भंडारा | भंडारा येथे रिक्त पदी (विनंती बदली) |

डॉ. प्रकाश गायकवाड, प्राचार्य, शा.अ. महाविद्यालय, औरंगाबाद यांच्याकडे संचालक, भा.प्र.से.प्र.केंद्र, औ.बाद पदाचा अतिरिक्त कार्यभार पुढील आदेश होईपर्यंत सोपविण्यात येत आहे.

प्रशासकीय कारणास्तव बदली झालेल्या प्राचार्य/संचालक यांना शासन नियमानुसार पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व दैनिक भत्ता अनुज्ञेय राहिल.

बदलीच्या आदेशाची अंमलबजावणी तात्काळ होण्याकरीता संबंधित सहसंचालकांनी खालील सुचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

१. बदलीबाबतचे आदेश प्राप्त झाल्यानंतर बदली झालेल्या प्राचार्य/संचालकांनी पर्यायी प्राचार्य/संचालक हजर होण्याची वाट न पाहता प्राचार्य पदाचा कार्यभार सेवाज्येष्ठ अधिव्याख्यात्याकडे सोपवून व त्याबाबतची माहिती संचालक व सहसंचालक, उच्च शिक्षण यांना देऊन बदलीच्या ठिकाणी रूजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त व्हावे.

२. पदस्थापनेत बदल करण्यासंदर्भात कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही प्राचार्य/संचालक यांनी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे प्राचार्य/संचालक शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

३. बदली झालेल्या ठिकाणी रुजू होईपर्यंतच्या कालावधीत कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येणार नाही.

४. सदर बदल्यांची अंमलबजावणी प्रभावीपणे होणे गरजेचे असल्यामुळे बदली झालेल्या सर्व प्राचार्य/संचालक यांच्या कार्यमुक्ततेच्या दिनाकांपर्यंत अथवा जास्तीत जास्त दिनांक ३१/०७/२०१५ पर्यंतचे वेतन ते सध्या कार्यरत असलेल्या महाविद्यालय/संस्थेने काढावे. त्यानंतरचे वेतन कोणत्याही परिस्थितीत बदलीपुर्वीच्या महाविद्यालय/संस्थेकडून काढण्यात येऊ नये, सदर वेतन संबंधित प्राचार्य/संचालक बदलीच्या महाविद्यालय/संस्थेत रुजू झाल्यानंतर बदलीनंतरच्या महाविद्यालय/संस्थेने काढावे. दिनांक ०१/०८/२०१५ पासुनचे वेतन बदलीपुर्वीच्या कार्यरत असलेल्या महाविद्यालय/संस्थेतून काढण्यात आल्यास त्या महाविद्यालय/संस्थेतील आंहरण व संवितरण अधिकारी यांना व्यक्तीशः जबाबदार धरण्यात येईल.

५. हे आदेश तात्काळ अंमलात येतील बदली झालेले प्राचार्य/संचालक कार्यमुक्त होऊन बदलीच्या ठिकाणी रुजू झाल्याबाबतचा अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी दिनांक ०१.०८.२०१५ पुर्वी शासनास सादर करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७२२१४३४४४३३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Niwrutti B Marale

Digitally signed by Niwrutti B Marale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Niwrutti B Marale
Date: 2015.07.23 10:40:32 +05'30'

**नि.भा.मराळे**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

२. सर्व विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण
३. सर्व प्राचार्य, शासकीय महाविद्यालये/संस्था
४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
६. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
७. सर्व संबंधित प्राचार्य
८. निवड नस्ती.

**प्रत :**- १. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव.
२. मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे खाजगी सचिव